**जेष्ठ विधिज्ञ श्री. दरायस खंबाटा आणि त्यांचे सहाय्य ॲड. तुषार हथिरामाणी यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**मा. सर्वोच्च न्यायालय येथील विशेष अनुमती याचिका (क्रिमिनल) क्र.१००८५/२०२१ मधील न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०१२२/प्र.क्र.१२/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: १७ मे,२०२२

**संदर्भ** :- (१) शासनपत्र, विधि व न्याय विभाग, क्र. ०६/एसपीपी/२०२२/'अ' शाखा,दि. १६.०२.२०२२.
(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. २९.०७.२०१५.
(३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. १६.०६.२०१७.

**शासन निर्णय**:-

मा. सर्वोच्च न्यायालय येथील विशेष अनुमती याचिका (क्रिमिनल) क्र.१००८५/२०२१ मध्ये शासनाच्या वतीने न्यायालयीन कामकाजासाठी संदर्भ क्र.१ अन्वये विशेष समुपदेशी म्हणून नियुक्त जेष्ठ विधिज्ञ श्री. दरायस खंबाटा आणि त्यांचे सहाय्यक श्री. तुषार हथिरामाणी यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली**

**१) जेष्ठ विधिज्ञ श्री. दरायस खंबाटा**

**अ)** प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी.......... रु.५,००,०००/- (अक्षरी रुपये पाच लक्ष फक्त) (आभासी सुनावणी (Virtual Hearing))

**किंवा**

प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी.......... रु.८,००,०००/- (अक्षरी रुपये आठ लक्ष फक्त) (प्रत्यक्ष सुनावणी (Physical Hearing))

**ब)** विचारविनिमय फी / प्रतितास / तासाचा भाग (Per Hour / Part thereof), मसूदा फी व शपथपत्र फी) ........ रु.१,००,०००/- (अक्षरी रुपये एक लक्ष फक्त)

**क)** प्रत्यक्ष प्रवास खर्च आणि निवास खर्च.

**२) ॲड. श्री. तुषार हथिरामाणी**

**अ)** प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी........रु.७,५००/- (अक्षरी रुपये सात हजार पाचशे फक्त) ) (आभासी सुनावणी (Virtual Hearing))

**किंवा**

प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी......... रु.१५,०००/- (अक्षरी रुपये पंधरा हजार फक्त) (प्रत्यक्ष सुनावणी (Physical Hearing))

**ब)** विचारविनिमय फी / प्रतितास / तासाचा भाग (Per Hour / Part thereof), मसूदा फी व शपथपत्र फी) ........ रु.४,५००/-(अक्षरी रुपये चार हजार पाचशे फक्त).

**क)** प्रत्यक्ष प्रवास खर्च आणि निवास खर्च.

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ जेष्ठ विधिज्ञ श्री. दरायस खंबाटा आणि ॲड. श्री. तुषार हथिरामाणी यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधिक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा" या लेखाशिर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत शासन निर्णय संदर्भ क्र. २ व ३ वरील वित्त विभाग शासन निर्णयानुसार मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१९१७५१४९५९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VENKATESH BHAT

Digitally signed by VENKATESH BHAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, pseudonym=4BD2A00BD54D7705C239CA2A5785A87EDE4514EC, serialNumber=6E277C9088A4CB8B53E535A4642A6800B908C5DBDB3A63175760874EBA717AE1, cn=VENKATESH BHAT
Date: 2022.05.19 17:53:37 +05'30'

**(व्यंकटेश भट)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२) पोलीस सह आयुक्त (का. व सु.), मुंबई.
३) वरिष्ठ पोलीस निरीक्षक, सायबर पोलीस ठाणे, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई-१, महाराष्ट्र राज्य.
५) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

७) जेष्ठ विधिज्ञ श्री. दरायस खंबाटा, मुल्ला हाऊस, ५१, महात्मा गांधी रोड, मुंबई - ४०० ००१.
८) ॲड. श्री. तुषार हथिरामाणी, मुल्ला हाऊस, ५१, महात्मा गांधी रोड, मुंबई - ४०० ००१.
९) कार्यासन अधिकारी (का-१४)/अ' शाखा, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (पोल-१०)